केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) नाशिक जिल्हयातील ज्ञाने, महानगरपालिका, मालेगांव हॉस्पिटल बांधकामासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा)
सन २०२०-२१.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२० /प्र.क्र.०७/का.७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - २१ मे, २०२०

**संदर्भ:** - १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/४७/२०९८-MsDP-MOMA, दि २४/०३/२०२०.
२. शासन ज्ञापन,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अ.वि.-२०२०/प्र.क्र.०७/ का-७,दि. २१ /०५ /२०२०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) राज्यातील ज्ञाने,महानगरपालिका मालेगांव जि.नाशिक येथे अल्पसंख्याकांसाठी बांधकामाचा रु.४१५.०० लाख इतका प्रस्ताव मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता.

२. केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१३/०३/२०२० रोजी झालेल्या २५ व्या बैठकीत नाशिक जिल्हयातील ज्ञाने, महानगरपालिका,मालेगांव येथे अल्पसंख्याकांसाठी १५ खाटांच्या हॉस्पिटल बांधकामासाठी एकूण रु.४१५.०४ लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (१) अन्वये कळविण्यात आले आहे.

३. केंद्र शासनाने संदर्भ क्र.(१) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त नाशिक जिल्हयातील ज्ञाने, महानगरपालिका मालेगांव येथे अल्पसंख्याकांसाठी हॉस्पिटल बांधकामासाठी केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.१२४.५१ लाख इतकी रक्कम मंजूर/वितरित केली आहे. PMJVK अंतर्गत नाशिक जिल्हयातील ज्ञाने, महानगरपालिका मालेगांव येथे हॉस्पिटल बांधकामासाठी केंद्र शासनाकडून मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रु.१२४.५१ लाख तसेच राज्य हिश्यातील रु.८३.०१ लाख अशी एकूण रु.२०७.५२ लाख इतका निधी जिल्हाधिकारी,नाशिक यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

४. केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.(१) येथील आदेशाव्दारे PMJVK अंतर्गत ज्ञाने, महानगरपालिका, मालेगांव,जि. अहमदनगर येथे अल्पसंख्याकांसाठी हॉस्पिटल बांधकामासाठी मंजूर/वितरित करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.१२४.५१ लाख तसेच राज्य हिश्यातील रु.८३.०१ लाख अशी एकूण रु.२०७.५२ लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी,नाशिक यांना खालील प्रमाणे वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(Rs. in lakhs)

| Name of Projects | Sharing Ratio | Unit | Unit Cost | Central Share | State Share | Total Cost | GOI 1st Installment | GOM 1st Installment |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **1** | **2** | **3** | **4** | **5** | **6** | **7** | **8** | **9** |
| Construction of 15 Bedded Hospital | 60:40 | 01 | 415.04 | 249.02 | 166.02 | 415.04 | 124.51 | 83.01 |
| **Total** | | **01** | **415.04** | **249.02** | **166.02** | **415.04** | **124.51** | **83.01** |

५. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(०८) व (०९) प्रमाणे सन २०२०-२१ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अहमदनगर जिल्हयातील श्रीरामपूर येथे अल्पसंख्याकांसाठी हॉस्पिटल बांधकामासाठी केंद्र व राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील रू.१२४.०० लाख एवढी रक्कम जिल्हाधिकारी, नाशिक यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

६. सन २०२०-२१ या वर्षात जिल्हाधिकारी, नाशिक यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(०८) व (०९) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी,नाशिक यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत नाशिक जिल्हयातील झाने,महानगरपालिका, मालेगांव येथे अल्पसंख्याकांसाठी हॉस्पिटल बांधकामासाठी आहरित केलेली रक्कम सदर विकासकामांच्या प्रयोजनासाठी अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करण्यात यावी.

७. PMJVK अंतर्गत हॉस्पिटल बांधकामाच्या अंमलबजावणीकरीता संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी मुख्य नियंत्रक अधिकारी व अंमलबजावणी अधिकारी राहतील.

८. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त झाने येथील अल्पसंख्याकांसाठी हॉस्पिटल बांधकाम हे केंद्र शासनाच्या टाईप प्लॅननुसार तसेच, यासाठीच्या सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या तांत्रिक मंजूरीनुसार महानगरपालिका, मालेगांव यांचेकडून करण्यात यावे.

९. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हॉस्पिटल बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करुन घ्यावी.शासन निकषानुसार तसेच हॉस्पिटल बांधकामाच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार यासाठीच्या निविदा प्रक्रिया करुन कामास तात्काळ सुरुवात करावी व तसे शासनास अवगत करावे.

१०. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हॉस्पिटल बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र+ राज्य हिश्यांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बॅकेत ठेवण्यात यावा. सदर प्रयोजनासाठी राष्ट्रीयीकृत बॅकेत स्वतंत्र खाते उघडण्यात यावे.

११. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय

नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

१२. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त हॉस्पिटल बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रासह) संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विकासकामांची माहिती व छायाचित्रे वेळोवेळी upload करावी.

१३. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या सूचनांनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमाअंतर्गत (PMJVK) ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करुन वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनाकरिता सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिकाऱ्यांवर विनाविलंब कारवाई करण्यात येईल.

१४. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा)(कार्यक्रम) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

१५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दि.१६ एप्रिल,२०२० अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. उपरोक्त केंद्र शासनाच्या हिश्यातील पहिला टप्प्यातील रु.१२४.५१ लाख इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००५२११५३५२८४२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.05.21 15:41:45 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अ.मु.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. विभागीय आयुक्त,नाशिक.
४. जिल्हाधिकारी, नाशिक.
५. आयुक्त, महानगरपालिका, मालेगांव
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१४. निवड नस्ती, (का.७).